डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली या विद्यापीठास सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) करीता अनुदान वितरीत करण्याबाबत (अनिवार्य)....

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कोकृवि-११२२/प्र. क्र.११८/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०२३.

**वाचा :-** १)वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३.
२)कृषि व पदुम विभाग, समक्रमांक शासन निर्णय दि.०३.०६.२०२२, दि.२१.०९.२०२२ व दि.०९.०१.२०२३.
३)नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे पत्र क्र.डॉबासाकोकृवि/लेखा-२/१४३४/२०२२, दि.१०.०२.२०२३.

**प्रस्तावना:-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (अनिवार्य) २४१५ ००३४, २४१५ ०१७९ व २४१५ ०२४१ या लेखाशिर्षांतर्गत ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्ठाकरीता ४९ टक्क्यांच्या मर्यादेत निधी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आलेला आहे. नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली करीता २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीकसंवर्धन (२४१५ ००३४), ०३-पशुसवर्धन (२४१५ ०१७९) व ०५- मत्स्यसंवर्धन (२४१५ ०२४१) (अनिवार्य) **३१-सहायक अनुदान (वेतनेतर)** या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून खालीप्रमाणे एकुण रु.८७,७०,०००/- (अक्षरी रुपये सत्याऐंशी लाख सत्तर हजार फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | अनिवार्य योजनेचे नाव | लेखाशीर्ष (अनिवार्य) | सन २०२२-२३ करीता अर्थसंकल्पित तरतूद | सन २०२२-२३ आर्थिक वर्षात यापुर्वी वितरीत निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान | सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात एकूण वितरीत अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ (५+६) |
| ०१) | मागणी क्र. डी-३, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०२) डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठास सहायक अनुदान | ०१ पीकसंवर्धन (२४१५ ००३४) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) | ३६३.३३ | १७८.०२ | **७६.३१** | २५४.२३ |
| ०२) | | ०३ पशुसंवर्धन (२४१५ ०१७९) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) | ११.०३ | ५.३९ | **२.३३** | ७.७२ |
| ०३) | | ०५ मत्स्यव्यवसाय (२४१५ ०२४१) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) | ४३.०२ | २१.०५ | **९.०६** | ३०.११ |
| | **एकूण** | | **४१७.३८** | **२०४.४६** | **८७.७** | **२९२.०६** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१. वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.
२. कृषि विद्यापीठांनी योजना/योजनेतर आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत अनिवार्य योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच खर्च करावा.
३. वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.
४. ज्या योजनांतर्गत/योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.
५. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात

येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६. कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७. विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. या प्रित्यर्थचा खर्च सन २०२२-२३ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि. रत्नागिरी, या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार तसेच वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४७/२०२३/व्यय-१ दि.१७.०२.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३०६१४२७४१६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2023.03.06 14:33:17 +05'30'

**(मिताली चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
३. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
४. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली,
५. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी / उपकोषागार अधिकारी, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
९. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
११. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१२. अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन ६अे /२अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ०३२,
१३. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.